सन २०१६-१७ करिता राज्य योजनेतंर्गत मृद संधारणाच्या कामांकरिता विविध वनवृत्तांमधील वनीकरणाच्या कामांचे नवीन बाब प्रस्ताव. (४४०६००४४)

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१६/प्र.क्र.३२७/फ-२**

**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**

**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,**

**दिनांक :- १० नोव्हेंबर, २०१६**

वाचा :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.पूरक-२०१६/प्र.क्र.१२८/अर्थसंकल्प-३, दि.१२.०८.२०१६.

३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/नबाप्र/प्र.क्र.३६/(००४४)/३६५/१६-१७, दि.२०.१०.२०१६.

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/नबाप्र/प्र.क्र.३६/(००४४)/१४३३/१६-१७, दि.२८.१०.२०१६.

**प्रस्तावना :-**

राज्य योजना सन २०१६-१७ करिता "मृद संधारणासाठी वनरोपण (४४०६ ००४४)" या योजनेकरिता रु.१५०४.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. त्याचप्रमाणे विधानमंडळाच्या सन २०१६ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये रु.१०००.०० लक्ष इतका अतिरिक्त नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. त्याअनुषंगाने, सन २०१६-१७ या वर्षामध्ये वन विभागांतर्गत विविध वनवृत्तामधील एकूण ११७८ हेक्टर क्षेत्रावर वनीकरणाची पुर्वपावसाळी कामे करण्याकरिता रु.१००१.४९ लक्ष इतक्या रक्कमेचे नवीन बाब प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ व २ येथील दि.२०.१०.२०१६ व दि.२८.१०.२०१६ रोजीच्या पत्रान्वये मान्यतेसाठी सादर केले असून सदरची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

३. वित्त विभागाच्या दि.१२.०८.२०१६ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१६-१७ या वर्षामध्ये योजनांतर्गत योजनांकरिता पूरक मागणीद्वारे अर्थसंकल्पित केलेल्या निधीच्या ८० % मर्यादेत निधी वितरणास मान्यता देण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने प्रस्तावांतर्गत मागणी केल्याप्रमाणे विविध वनवृत्तामधील एकूण ११७८ हेक्टर क्षेत्रावर वनीकरणाची पुर्वपावसाळी कामे करण्याकरिता प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने अर्थसंकल्पित निधीच्या मर्यादेत **रु.८००.०० लक्ष** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. मागील वर्षी सदर योजनेकरिता वितरित केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल याची दक्षता घ्यावी. तसेच मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेत कामे निश्चित करावीत. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.२०.०४.२०१६ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

५. सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-१०, प्रधान शीर्ष - ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, १०१ वनसंरक्षण विकास व पुनर्निर्मिती, (००)(०२) मृद संधारणासाठी वनरोपण (४४०६ ००४४) या लेखा शिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ व २ येथील अनुक्रमे दि.२०.०४.२०१६ व दि.१२.०८.२०१६ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११०१४०८४८६४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2016.11.10 14:11:49 +05'30'

**(डी.एल.थोरात)**

सह सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति :-** १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे,नाशिक,यवतमाळ,पुणे, धुळे, औरंगाबाद, चंद्रपूर, गडचिरोली व कोल्हापूर
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
६) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
७) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.